**चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्रात मुलींच्या वसतीगृहाचे बांधकामासाठी (Construction of Girls Hostel) निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र.५५/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- २७ मार्च, २०१७**

वाचा :- १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक वनबा-२०१६/प्र.क्र.५५/फ-९, दिनांक १०.३.२०१६

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक वनबा-२०१६/प्र.क्र.५५/फ-९, दिनांक ३१.३.२०१६

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. १/ १६-१७/१७७९/२०१६-१७, दिनांक २१.१२.२०१६ चे पत्र.

४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक वनबा-२०१६/प्र.क्र.५५/फ-९, दिनांक १५.३.२०१७

**प्रस्तावना :-**

राज्य योजने अंतर्गत सन २०१६-१७ करिता चिचपल्ली येथे बांबू संशोधन केंद्र स्थापना (४४१५ ०१९२) या लेखाशीर्षाअंतर्गत एकूण रु.५००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्रात मुलींच्या वसतीगृहासाठी रू.३४०.८३ लक्ष निधी संदर्भाधीन दिनांक ३१.३.२०१६ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला आहे. बांबूचा जास्तीत जास्त वापर करुन वसतिगृहाच्या इमारतीचे अंदाजपत्रक तयार करण्याच्या अनुषंगाने मुलींच्या वसतीगृहाचे (G+२) बांधकाम करणेकरीता रु.४३१.७८ लक्ष रकमेच्या सुधारीत अंदाजपत्रकास संदर्भाधीन दिनांक १५.३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. सदर मुलींच्या वसतीगृहासाठी रू. ३४०.८३ लक्ष निधी दिनांक ३१.३.२०१६ च्या शासन

निर्णयान्वये यापूर्वीच वितरीत केलेला आहे. त्यामुळे आता, इमारतीचे बांधकाम बांबूचा वापर करून, तयार करण्याचे असल्यामुळे, मुलींच्या वसतीगृहाचे (G+२) बांधकाम करणेकरीता रु.९०.९५ लक्ष इतका अतिरिक्त निधी वितरीत करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

राज्य योजने अंतर्गत सन २०१६-१७ करिता चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्रात मुलींच्या वसतीगृहासाठी (G+२) रू. ९०.९५ लक्ष निधी (४४१५ ०१९२) या लेखाशीर्षाअंतर्गत विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गतच्या तरतूदीचा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
२. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.
३. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १७.४.२०१५ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान शिर्ष ४४१५, कृषी विषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना, राज्य योजना अंतर्गत योजना, (००४) संशोधन (००) (०२) बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र चिचपल्ली (४४१५ ०१९२) या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १७.०४.२०१५ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७१६५१४९६६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.03.27 16:54:22 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर.
६. संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली, चंद्रपूर
७. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. कार्यासन अधिकारी- इमारत-३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन अधिकारी- व्यय-१०, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कार्यासन अधिकारी- १४७५, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)